जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी व अधिपत्याखालील रुग्णालयांतील अग्निशमन यंत्रणा बसविण्याच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२१/प्र.क्र.३१६/आरोग्य ३अ**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३० डिसेंबर, २०२१.

वाचा : सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक : संआसे /कक्ष-३/ टे-/६रत्नागिरीजिल्हाफायरयंत्रणा/२०७०९-११/२१ दिनांक ,२२.१२२०.२१.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २२.१२.२०२१ च्या पत्रान्वये, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी व अधिपत्याखालील उपजिल्हा व ग्रामीण रुग्णालयातील फायर फायटिंग, फायर अलार्म, फायर स्प्रिंकलर इत्यादी कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याकरीता प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर अंदाजपत्रक सहायक अभियंता (विदयुत), सार्वजनिक बांधकाम उप विभाग, रत्नागिरी यांनी तयार केलेली असून, उप अभियंता (विदयुत) सार्वजनिक बांधकाम उपविभाग, रत्नागिरी यांनी तपासलेली आहेत. तसेच कार्यकारी अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग ,ठाणे व जिल्हा शल्य चिकित्सक, रत्नागिरी व उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर यांनी प्रमाणित केले आहे. अधिक्षक अभियंता (विदयुत),प्रादेशिक विदयुत मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२१-२२ च्या दरसूचिवर आधारीत आहेत. त्यानुसार सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी व अधिपत्याखालील उपजिल्हा व ग्रामीण रुग्णालयातील फायर फायटिंग, फायर अलार्म, फायर स्प्रिंकलर इत्यादी कामाकरीता रु. ७,०९,७३,०४६/- (रुपये सात

कोटी, नऊ लक्ष, त्र्याहत्तर हजार, शेहचाळीस फक्त) खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नांव | रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| 1 | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital,Pali Dist- Ratnagiri | Rs.18,07,535/- |
| २. | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital, Lanja Dist- Ratnagiri | Rs.19,21,085/- |
| ३. | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital, Raypatan Dist- Ratnagiri | Rs.19,38,141/- |
| ४. | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital, Rajapur Dist- Ratnagiri | Rs.18,28,729 /- |
| ५ | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital, Guhagar Dist- Ratnagiri | Rs.18,97,900 /- |
| ६ | Providing fire alarm and fire fighting arrangement at Rural Hospital, Mandangad Dist- Ratnagiri | Rs.17,74,417 /- |
| ७ | Providing fire alarm and fire fighting arrangement in Rural Hospital and Trauma Care Unit, Sangameshwar Dist-Ratnagiri | Rs.26,74,731/- |
| ८ | Providing fire alarm and fire fighting arrangement at Sub District Hospital, Dapoli Dist- Ratnagiri | Rs.19,40,249/- |
| ९ | Providing fire alarm and fire fighting arrangement at Sub District Hospital, and Trauma Care Unit, Kalambani Dist-Ratnagiri | Rs.20,43,001/- |
| १० | Providing fire alarm system with fire extinguisher, fire hydrant and firesprinklers system to Main Building of District Civil Hospital, Ratnagiri Dist-Ratnagiri | Rs.2,44,72,152/- |
| | Providing fire alarm system with fire extinguisher, fire hydrant to Eye Ward, Xray, Blood bank, SNCU, TB Ward Building of District Civil Hospital, Ratnagiri Dist-Ratnagiri | Rs.1,29,63,722/- |
| ११ | Providing fire alarm system with fire extinguisher, fire hydrant and firesprinklers system to Sub District Hospital, Kamathe Tal- Chiplun Dist- Ratnagiri | Rs.1,57,11,384/- |
| | **Total** | **Rs.7,09,73,046/-** |

<u>अटी व शर्ती</u> :-

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास मुख्य अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी काढलेल्या त्रुटीची पूर्तता करणे व मुख्य अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक दिनांक २९.१०.२०१८ अन्वये अंदाजपत्रकातील दरसुची बाहय दर मंजुरी करणे बंधनकारक आहे.

३) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर कामाची वेगवेगळी निविदा न करता सर्व कामाची एकत्रित निविदा करण्यात यावी.

५) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या-भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

८) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

९) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

१०) उपरोक्त १ ते ९ येथील अटीची पूर्तता करण्याची जबाबदारी सबंधित जिल्हा शल्य चिकित्सक व कार्यकारी अभियंता,(विदयुत) यांची राहील.

३. तसेच उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथील प्रपत्रातील अनुक्रमांक ०१ ते ०७ येथील ग्रामीण रुग्णालयाच्या कामावरील रु.१,३८,४२,५३८/- इतका खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष

"४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा, ०४- सार्वजनिक आरोग्य, १०४- सामुहिक आरोग्य केंद्र, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ०३९१), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

४. उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथील प्रपत्रातील अनुक्रमांक ०८ ते ०११ येथील रुग्णालयांच्या कामावरील रु. ५,७१,३०,५०८/- इतका खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

५. सदर रुग्णालयांमध्ये अग्निशमन यंत्रणा बसविण्याच्या कामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३०१११५१६९४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF,
cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2021.12.30 15:01:30 +05'30'

( दी. नि. केंद्रे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, रत्नागिरी.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. रत्नागिरी.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती (आरोग्य-३अ).